**महाराष्ट्र शासन**

**फॅक्स क्र.(०२२) २२८८६०२४**

क्रमांक :- आसुअं २०१४/दत्तमत/(प्र.क्र.१३/११)/का.-३
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २५ मार्च, २०११.

प्रति,

मा. सदस्य सचिव,
राज्य विधी सेवा प्राधिकरण, उच्च न्यायालय, मुंबई

**विषय :-** सन २०१०-११ या वर्षाकरिता सुधारित अनुदानाचे वाटप - "मागणी क्रमांक जे-१, २०१४ **न्यायदान (दत्तमत)** १२४(००)(०३) महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, (२०१४ ० ...)"

महोदय,

उपरोक्त विषयाधीन मुख्यलेखाशिर्षाखालील सन २०१०-११ या वित्तीय वर्षाचे उद्दिष्टनिहाय सुधारित अनुदानाचे वाटप सोबतच्या विवरणपत्र "ब" मध्ये दर्शविल्याप्रमाणे मान्य करण्यात येत आहेत.

२. संबंधित सर्व नियंत्रक/ प्राक्कलन अधिकाऱ्यांना विनंती करण्यात येते की, विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे रु. **६,७९,३८,०००/-** ( सहा कोटी एकोणऐंशी लक्ष अडतीस हजार फक्त ) इतकी रक्कम चालू वित्तीय वर्षासाठी विवरणपत्र "ब" मध्ये दर्शविलेल्या उद्दिष्टानंर्गत आठमाही सुधारित अनुदान म्हणून मंजूर करण्यात आली आहे त्यामुळे कोणत्याही परिस्थितीत प्रत्येक उद्दिष्टनिहाय मंजूर तरतूदीपेक्षा अधिक खर्च होणार नाही. तसेच वित्तीय अनियमितता होणार नाही याची विशेष दक्षता घेण्यात यावी. यासंदर्भात अर्थसंकल्पीय नियमावलीतील नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. ज्या उद्दिष्टाखाली अनुदानामध्ये आपल्या कार्यालयाकरिता तरतूदीमध्ये घट झाली आहे तेवढी घट तात्काळ अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे शासनास परत करावी. ज्या उद्दिष्टाखाली अनुदानात वाढ करण्याचे विनंती केली आहे त्या उद्दिष्टाखालील अतिरिक्त अनुदान पुरक मागणीद्वारे उपलब्ध होणार असल्याने सदर अनुदान पुरक मागणी विधीमंडळाने मंजूर झाल्याशिवाय खर्च करण्यात येऊ नये.

३. प्राक्कलन अधिकाऱ्यांनी संबंधित तपशीलवार उपशीर्षनिहाय उद्दिष्टनिहाय सुपूर्द केलेल अनुदानाचे विभागणी करून दिनांक ३१ मार्च २०११ पर्यंत होणाऱ्या अचूक खर्चांचे अंदाज संपूर्ण तपशीलवार विवरणपत्र अ मध्ये दर्शवून बचतीचा अहवाल सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३० मार्च, २०११ पूर्वी शासनास प्राप्त होतील याबाबत विशेष काळजी घेण्यात यावी. तसेच बचतीचे अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे देखील शासनास परत करण्यात यावे, ही विनंती.

४. संबंधित सर्व नियंत्रक / प्राक्कलन अधिकाऱ्यांचे लक्ष शासन परिपत्रक क्रमांक: बीसीसी १०८८/३४४२/का.-१, दिनांक २० एप्रिल, १९९१ कडे वेधण्यात येत असून त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्याकडे सुपूर्द केलेल्या अनुदानातून जरी बचत स्पष्ट होत नसली तरीही बचतीचा अहवाल विहित तारखेपूर्वी न चुकता पाठविण्याबाबत असलेल्या ज्या कार्यालयांकडे विनिर्दिष्ट प्रयोजनार्थ तरतूद सुपूर्द केलेली आहे त्याच प्रयोजनासाठी तेवढी रक्कम वापरल्यानंतर जी सगळी उर्वरित रक्कम इतरत्र न वापरता निव्वळ बचतीची रक्कम म्हणून कारणे व समर्थनासह विनिर्दिष्टपूर्वक अर्थसंकल्प कपात करून परत केली तरच त्यास बचतीची रक्कम म्हणून समजण्यात येईल.

५. दूरध्वनी,वीज व पाणी शुल्क या उद्दिष्टाकरिता वापरण्यात आलेल्या (-) वजा रकमेइतकी रक्कम कार्यालयांनी खर्चात शिल्लक ठेवण्यात यावी जेणेकरून अंतिम समायोजनामध्ये याबाबतचे पुनर्विनियोजन करणे शक्य होईल.

६. ज्या उद्दिष्टाखाली अनुदान कमी झालेले आहे ते संगणकीय वितरण प्रणालीद्वारे परत करण्यात यावे.

७. बचतीसंबंधात अपेक्षेपेक्षा खर्च कमी अथवा अनुदान उशिरा प्राप्त झाले आणि अधिक खर्चासंबंधात मागणीपेक्षा अनुदान कमी मिळाले अशा प्रकारची बचत/वाढीचे समर्थन/कारणे नमूद न करणे अर्थसंकल्पीय अनियमिततेच्या दृष्टीकोनातून योग्य ठरत नाही, याचीही कृपया नोंद घेण्यात यावी.

आपला

( वि.श्री.पाटील )
कार्यासन अधिकारी

सोबत:- वरीलप्रमाणे.

D:\RE-10-11\RE DISTRIBUTION 10-11\RE 2014 vole\re2014-314---1

प्रती: माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने).

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा)-एक,महाराष्ट्र,मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

उप सचिव, (सेवा) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

कार्यासन अधिकारी- २४, १९.२२, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग, अर्थसंकल्प-१४/व्यय-६,

निवडनस्ती.

## वि व र ण प त्र - अ

सन २०१०-११ च्या बचतीच्या रकमा परत करण्याबाबतचा अहवाल

लेखाशीर्ष :- २०१४ न्यायदान (दत्तमत /भारित )

उपशीर्ष :-

(रुपयामध्ये)

| तपशीलवार लेखाशीर्ष | मंजूर अनुदान | दिनांक २८.२.१० पर्यंतचा प्रत्यक्ष खर्च | उर्वरित कालावधीतील संभाव्य खर्च | एकूण (३+४) | बचत (-) किंवा वाढ (+) | बचत/वाढीची सुस्पष्ट कारणे (रकाना रिक्त ठेवू नये) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |

## वि व र ण प त्र "ब"

(रुपये हजारात)

| तपशीलवार लेखाशीर्ष (संकेतांक क्रमांकासह) | सन २०१०-११ या वित्तीय वर्षासाठी सुधारित अनुदानाचे वाटप |
|---|---|
| "मागणी क्रमांक जे-१,२०१४ न्यायदान (दत्तमत) ११४(००)(०३) महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण. (२०१४ ०३१ ४)" | |
| ०१- वेतन | ६२५३३ |
| ०३- अतिकालीक भत्ता | २७ |
| ०६- दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ४९३ |
| ११- प्रवास खर्च | १५४ |
| १३- कार्यालयीन खर्च | २६६९ |
| १४- भाडेपट्टी व कर | ७५ |
| १६- प्रकाशने | ५ |
| १७- संगणकावरील खर्च | ९० |
| २६- जाहिरात , विक्री व प्रसिध्दी | २५ |
| २८- व्यावसा | ११८७ |
| एकूण | ६७९३८ |